महाराष्ट्र कृषि सेवा, गट-अ, कृषि उपसंचालक संवर्गातील अधिकाऱ्यांच्या नियतकालीक बदली.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन आदेश क्रमांकः आकृवि १२२३/प्र.क्र.६६ (१२) /१५अे**
मंत्रालय विस्तार इमारत,
मंत्रालय, मुंबई - ३२.
दिनांक : ३० मे, २०२३.

**संदर्भ:-** १) "महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनिय,२००५." ची दि.२५/५/२००६ ची अधिसूचना.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार राज्य शासकीय अधिकारी व कर्मचारी यांच्या प्रत्येक वर्षी एप्रिल व मे महिन्यात सर्वसाधारण बदल्या करण्यात येतात.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने नियतकालिक बदलीस पात्र असलेल्या या विभागातील महाराष्ट्र कृषि सेवा, गट-अ, कृषि उपसंचालक (वे.श्रे. S-२०: रु.५६१००-१७७५००) संवर्गातील अधिकाऱ्याला खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे बदलीने पदस्थापना करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिका-याचे नांव व सध्याची पदस्थापना | बदलीने पदस्थापना |
|---|---|---|
| १. | श्री.शाह आरिफ अहमद गुलाम दस्तगीर<br>प्रकल्प व्यवस्थापक, डॉ.पंजाबराव देशमुख जैविक शेती मिशन, अकोला | उपविभागीय कृषि अधिकारी, नागभीड, जि.चंद्रपूर (रिक्त पदी) |

२. उपरोक्त अधिकाऱ्याने आपल्या पदाचा कार्यभार समकक्ष वा नजीकच्या कनिष्ठ अधिकाऱ्याकडे सोपावून नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजु व्हावे व तसा अहवाल आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

३. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांनी बदली झालेल्या अधिकाऱ्यास कोणत्याही प्रकारची रजा मंजूर न करता त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांच्या बदलीच्या जागी रूजू होण्यास सांगावे. जे नियंत्रण अधिकारी बदली झालेल्या अधिकाऱ्यास विहित मुदतीत कार्यमुक्त करणार नाहीत, अशा अधिकाऱ्यांविरूध्द शिस्तभंग कारवाईचा प्रस्ताव आयुक्त (कृषि) यांनी शासनास सादर करावा.

४. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील हे कृपया पहावे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०५३०१८२५१९४००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

AMOL NILAKANTH SAKHARKAR

Digitally signed by AMOL NILAKANTH SAKHARKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=36b60751d094e56d974e1a44ec234c475fb0de5b35a79c1cf69a588f212b260e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BB4888CEBBF4B7A6440C6531A52925E3C8140B1C28DF723D8F006D11BC169A08, cn=AMOL NILAKANTH SAKHARKAR
Date: 2023.05.30 18:25:41 +05'30'

**( अ.नि.साखरकर )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (कृषि) यांचे स्विय सहायक, कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई.
४. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा) ½, महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
५. संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, पुणे.
६. संबंधित विभागीय कृषि सह संचालक ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )
७. संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )
८. कृषि सह संचालक, (आस्थापना), कृषिआयुक्तालय, पुणे
९. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )
१०. संबंधित अधिकारी ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )
११. निवड नस्ती /१५अे.